**पुनर्वसन सदनिकांचे आकारमान २६९ चौ.फू. वरुन ३०० चौ.फूट करण्याची प्रकरणे कालबध्दरित्या निकाली काढण्यासाठी स्वतंत्र कक्षाची निर्मिती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : झोपुयो-१२०३/प्र.क्र.१६७/२०२०/झोपसु-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १९ मार्च, २०२०

**प्रस्तावना :-**

बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रासाठी अधिसूचित झालेल्या अंतिम सुधारित विकास नियंत्रण नियमावली २०१४ ते २०३४ मध्ये विनियम ३३(१०) नुसार राबविण्यात येत असलेल्या झोपडपट्टी पुनर्वसन योजनेमध्ये पुनर्वसन सदनिकांचे आकारमान २५ चौ.मी. ऐवजी २७.८८ चौ.मी. अशी तरतूद करण्यात आलेली आहे.

फेब्रुवारी-मार्च, २०२० मध्ये झालेल्या अर्थसंकल्पिय अधिवेशानावेळी म.वि.स. नियम, २९३ अन्वयेच्या प्रस्तावावरील चर्चेत उत्तर देतांना दि.०३ मार्च, २०२० रोजी २६९ चौ.फूट वरुन ३०० चौ.फूट ची वाढीव आकारमानाची घरे याबाबतच्या ४०० फाईल्स प्रलंबित असल्याचे तसेच पुढील १ महिन्याच्या कालावधीत सदरच्या ४०० LOI च्या प्रलंबित प्रकरणासंबंधातील निर्णय घेण्यात येईल, असे मा.मंत्री (गृहनिर्माण) यांनी सभागृहाला आश्वासित केलेले आहे. सदर पार्श्वभूमीवर झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने मंजुरी दिलेल्या आणि बांधकाम सुरु असलेल्या २६९ चौ.फूटाच्या आकारमानाच्या पुनर्वसन सदनिका ३०० चौ.फूटात रुपांतरीत करण्याबाबतची सर्व प्रकरणे कालबध्दरित्या निकाली काढण्यासाठी महाराष्ट्र झोपडपट्टी क्षेत्र (सु.नि.व पु.) अधिनियम, १९७१ च्या कलम ३के आणि ३स मधील तरतुदीस अनुसरुन शासनाने श्री.आर.बी.मिटकर, उपमुख्य अभियंता, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे स्वतंत्र कक्षाची निर्मिती करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-**

झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने मंजुरी दिलेल्या आणि बांधकाम सुरु असलेल्या २६९ चौ.फूटाच्या आकारमानाच्या पुनर्वसन सदनिका ३०० चौ.फूटात रुपांतरीत करण्याबाबतची सर्व प्रकरणे कालबध्दरित्या निकाली काढण्यासाठी महाराष्ट्र झोपडपट्टी क्षेत्र (सु.नि.व पु.) अधिनियम, १९७१ च्या कलम ३के आणि ३स मधील तरतुदीस अनुसरुन शासनाने श्री.आर.बी.मिटकर, उपमुख्य अभियंता, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे स्वतंत्र कक्षाची निर्मिती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकारी/कर्मचाऱ्यांचे नांव व पदनाम |
|---|---|
| १ | श्री.आर.बी. मिटकर, उपमुख्य अभियंता, झो.पु.प्रा.--- कक्ष प्रमुख |
| २ | श्री.आर.एच.पगार, सहायक अभियंता, झो.पु.प्रा. --- सदस्य |
| ३. | श्री. एस.आर.येवले, सहायक अभियंता, झो.पु.प्रा. --- सदस्य |
| ४. | श्री. उदय मराठे, सहायक अभियंता, झो.पु.प्रा. --- सदस्य |
| ५. | श्री. आर.बी.खरात, दुय्यम अभियंता, झो.पु.प्रा. --- सदस्य |
| ६ | श्री. एस.एस. कासुल्ला, दुय्यम अभियंता, झो.पु.प्रा. --- सदस्य |
| ७ | श्री. व्ही.सी.तिऱ्हेकर, दुय्यम अभियंता, झो.पु.प्रा. --- सदस्य |

झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने मंजुरी दिलेली आणि बांधकाम सुरु असलेली २६९ चौ.फूट आकारमानाच्या सदनिका असलेली सर्व प्रकरणे ३०० चौ.फूट इतक्या वाढीव आकारमानात रुपांतरीत करण्याबाबतची कार्यवाही उपरोक्त कक्ष **१ महिन्याच्या** आत करेल. आवश्यकतेनुसार / उपलब्धतेनुसार वरील कक्षातील अभियंत्यांच्या निवडीत बदल करण्याचा अंतिम अधिकार कक्ष प्रमुखाला राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१९१९२३४४२६०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DURGAPRASAD POCHAYYA MYLAWARAM

Digitally signed by DURGAPRASAD POCHAYYA MYLAWARAM
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=f4fd0ac26ad2a365a8e829907c5e76b911fed9b1b9e48cc2854
c4b8a14b0d70c, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=befbb0ae84804c4da8d35abf2195ebb1dc727de9b0a09
4bea77f4ca6be5965db, ou=HOUSING DEPT, o=GOVERNMENT OF
MAHARASHTRA, cn=DURGAPRASAD POCHAYYA MYLAWARAM
Date: 2020.03.19 19:27:54 +05'30'

**(दुर्गाप्रसाद मैलावरम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. मंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा. राज्यमंत्री,गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२
५. अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
६. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
७. प्रधान सचिव (नवि-१/नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. अपर मुख्य सचिव (सहकार),सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुबई-३२.
९. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, महापालिका कार्यालय, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
१०. विभागीय आयुक्त सर्व
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, वांद्रे (पुर्व), मुंबई-५१
१२. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
१३. सचिव, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, वांद्रे (पुर्व), मुंबई-५१
१४. सर्व अपर जिल्हाधिकारी (अति./निष्का.)
१५. सर्व उपजिल्हाधिकारी (अति./निष्का.) तथा सक्षम प्राधिकारी
१६. निवड नस्ती, झोपसु-१ कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२